मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१३१६/(३६५/२०१६)/आ.(वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**तारीख: २९ जुलै, २०१७.**

**वाचा:-** सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.ईएसबी-१११७/प्र.क्र.५४/१३, दि.०१.०७.२०१७.

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील खालील अधीक्षक अभियंता (स्थापत्य) यांना मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर रुपये ३७४००-६७००० + श्रेणीवेतन (Grade pay) रु.८९००/- या वेतनश्रेणीत संदर्भीय दि.०१.०७.२०१७ च्या पत्रान्वये आस्थापना मंडळाने शिफारस केल्यानुसार **तदर्थ / तात्पुरत्या स्वरुपात** पदोन्नती देण्यात येत आहे.

१. श्री.सुरेंद्रनाथ हरीबा खरात (अ.जा.) (ज्ये.क्र.१६)

२. वर नमूद अधिकाऱ्यास खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ / तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर पदोन्नती ही तदर्थ व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

२) सदर पदोन्नती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ (ज्येष्ठता विनियम व ज्येष्ठता यादीची सुधारणा) नियम, १९८३ अन्वये वेळोवेळी सुधारित होणाऱ्या अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गाच्या ज्येष्ठतेच्या अधीन राहील.

३) श्री.खरात यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्याची पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने खालीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.सुरेंद्रनाथ हरीबा खरात | अधीक्षक अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद. | मुख्य लेखा परिक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद. | रिक्त पदी. |

४. वरील पदोन्नत अधिकारी हे नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधीत अधिकाऱ्यांनी शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने मुख्य अभियंता या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतननिश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्रमांक ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन, करण्यात यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०७२९११५४४६०९२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Jagdish Sajanikar

Digitally signed by Prashant Jagdish Sajanikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a8cd67058795ac5a961c2b41207cb6d24b79e17716af754c9fc40fd4145416f1, serialNumber=217003e42c820ec29c89162937f98929453cc6295b34f71ea285041053a66aa7, cn=Prashant Jagdish Sajanikar
Date: 2017.07.29 12:24:01 +05'30'

**(प्रशांत साजणीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
८) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
९) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
१२) संबंधीत अधिकारी. (कार्यालय प्रमुखामार्फत)
१३) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१६) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.